विचारवंत मानव–वागत आहे, अशा वेळेस सेवा, दुसऱ्याचें दुःख दूर करणें हें ध्येय म्हणून मांडणें योग्य आहे. मानव जातीची सेवा हें जीवनाचें ध्येय असणे भव्य व सुदर वाटतें खरें–परतु––

पौर्वात्य देशांची निष्ठुर व कठोर अशी विवेचक बुद्धि पुढें येऊन विचारिते " काय हो, सेवा हे जर ध्येय ठरलें तर मानव जातीला सदैव सेवेची अपेक्षा राहणार हे उघड आहे. म्हणजेच मानव जात सदैव दुबळी राहणार असें नाही का होत ? मानव जातीचा दुबळेपणा का आपणांस चिरजीव करावयाचा आहे ? आईबापांना सेवेचा आनद मिळावा म्हणून मुलानें सदैव पंगू राहावें काय ? मुलाला सेवेची जरूर राहणार नाहीं, तो आपल्या पायावर उभा आहे, ह्यांत खरा आनंद नाहीं का ? मला सेवेचा सदैव आनद हवा असेल तर जगांत सदैव दुःख व दैन्यहि पण असली पाहिजेत. सेवा हे अतिम ध्येय असू शकणार नाही. आत्म्याची अनंत रूपानें प्रकट होण्याची अनंत शक्ति–ह्याना सस्कृति कितीहि वाढली तरी ती तृप्त करूं शकेल कां ? मानव जातीची सेवा हें साधन आहे व साध्याची प्राप्ति प्रत्येकाच्या अनुभवावर अवलंबून राहील. सर्व ठिकाणी परमेश्वर पाहणे हे साध्य आहे. सेवेनें हे साध्य प्राप्त होईल हे खरें. सामाजिक सुधारणा, प्रगति ह्या गोष्टी चांगल्या आहेत–परंतु हीं अतिम साध्यें नव्हेत. ह्याचा अर्थ सेवेला महत्त्व नाहीं असा नव्हे. आजच्या आपल्या जीवनाला सेवा हें ध्येय योग्यच आहे व तेच एक ध्येय सद्यः परिस्थितीत सर्वांनीं मानिले पाहिजे.

ज्यांना ह्या जगाच्या पलीकडील तत्त्वाचें अंधुकहि दर्शन झालें नाहीं, त्यांना समाजाची, मानव जातीची सुधारणा हेंच ध्येय शोभतें परंतु हें जग म्हणजे आत्म्याची पाठशाळा आहे ह्या शाळेच्या बाहेर अनंत जीवन आहे ही गोष्ट खरी. परंतु शाळेच्या बाहेरील जीवनांत त्यालाच उत्कृष्ट जगतां येईल, जो शाळेत असतांना शाळेच्या जीवनांत उत्कृष्ट काम करीत असतो, शाळेच्या सर्व जीवनांत–खेळांत, डावांत, अभ्यासांत, वादविवादांत, वनभोजनांत–सर्व गमतीच्या गोष्टीत, त्याप्रमाणेंच गंभीर गोष्टीत जो तनमनधन ओतीत असे, आत्मा रंगवीत असे, तोच शाळेच्या बाहेर गेल्यावर तेथेहि उत्कृष्टपणेंच वागेल व आदर्शभूत होईल. जो इहलोकीं चांगला वागेल त्यालाच परलोकाची मजा. जो ह्या मर्यादित जगांत नीट खेळला, तोच अनंत

जीवनांतील खेळांत खेळाडू म्हणून शोभेल. जग ही परलोकाची शाळा आहे, गृहस्थाश्रम ही संन्यासाची शाळा आहे. जो गृहस्थ स्वैर व स्वच्छंद वागतो, तो खरा संन्यासी कसा होणार ? उत्कृष्ट गृहस्थाश्रम ज्यानें केला तोच उद्यां उत्कृष्ट संन्यासी होऊ शकेल

शिवाय ह्या जगांत कायमची कोणाची प्रगति झाली असें इतिहास सांगत नाहीं. भरती ओहोटी हा या जगाचा कायदा आहे. रिते भरतात व व भरलेले रिकामे होतात चढलेले पडतात व पडलेले चढतात. असें हें जग आहे. आज पाश्चिमात्य राष्ट्रांत एकीकडे सपत्तीत लोळणारे कुबेर आहेत तर दुसरीकडे दारिद्र्यानें पीडिलेले, रोगांनीं पछाडलेले, ज्ञानहीन व अन्नान्न असे मजुरहि पडलेले आहेत. युरोपचा उदय झाला आहे; परंतु आशियाचा अस्त झाला आहे. एकाचा अस्त तो दुसऱ्याचा उदय. एका बाजूला सुख दिसतें; त्याच्या दुसऱ्या बाजूला तितकेंच दुःख दिसतें. कोणाचा तरी नफा व दुसऱ्या कोणाचा तरी तोटा. आणि ह्यासाठीच प्लासी-सारख्या मग लढाया होतात. चिरंतन प्रगति ह्या जगांत नाही. प्रगतीचा लंबक सारखा पुढे मागे होत आहे. युरोपचा उदय सारखा टिकणार नाहीं, आशिया कायमचा पडून राहणार नाहीं. एक अंधारांत असेल तेव्हांच दुसरा प्रकाशांतला शोभणार. विरोधानेंच सारें खुलून दिसतें ! पडणाऱ्यांनी फिरून चढले पाहिजे, पतनांतून अभ्युदयाकडे गेलें पाहिजे. कारण नाहीं तर दुसऱ्या पडणाऱ्यांना चढावयास स्फूर्ति कोठून मिळणार, शक्ति कोठून मिळणार ? एकमेकांनीं एकमेकांस स्फूर्ति देत राहावयाचें व हा आरोहावरो–हाचा खेळ खेळत राहावयाचें.

मानवजात येथून तेथून सारी एक आहे; परस्परावलंबी आहे. रोमन लोकांची विधायक व व्यावहारिक कामगिरी हिंदूंना महत्त्वाची आहे व हिंदूंच्या उपनिषदांतील खोल व गंभीर दृष्टि पाश्चिमात्यांना तितकीच आवश्यक आहे. दिक्कालांच्या मर्यादेत प्रगति हें सत्य आहे; प्रगति हें ध्येय आहे; व या सत्यासाठीं, या ध्येयासाठीं, आपण जगणें व झिजणें हें बंधनकारक आहे, कर्तव्यच आहे.

---

# मृत्यूवर विजय -११-

कोणी कोणी परमेश्वरानें मदत करावी, आपलें दुःख व दैत्य त्यानें हरण करावे म्हणून पूजा करितात. त्या सर्व सामर्थ्यवान प्रभूची आपणांस धीर मिळावा म्हणून प्रार्थना करितात. आणि अशा आर्तभक्तांना धैर्य प्राप्त होतें यांत शंकाच नाही. कारण शत्रू कोणीहि असो, परमेश्वर आपल्या बाजूस आहे, अशी अशा आर्तभक्ताची साहजिकच भावना असते; परंतु या अशा आर्तभक्तीत दोष येतोच. आर्तभक्तीत देवाला आपण राबवितों, त्याला आपले काम करावयास लावितों. आपली जीं पै किंमतीची क्षुद्र सुखे ती प्राप्त करून घेण्यासाठी देवाला आपण एक साधन बनवितों. देवाहून आपण आपल्या कामनानाच श्रेष्ठ केले !

कांही लोक दैववादी असतात. परतु यांतहि धोका आहे, दोष आहे. कारण त्यामुळें दैवच सर्व काही करीत आहे, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु अशा दैवाच्या हातांतील आपण केवळ बाहुली आहोंत असें आपण मानू लागलों. परंतु वस्तुस्थिति याच्या उलट असतें. कार्य करणारे क्रियावान् आपण असतो व दैव हें निष्क्रिय व पगु असतें. आपणच दैवाचे नियते असतों, दैव घडवीत असतों. दैववादी अरब शिपाई घोड्यावर स्वार होतो. भाला सरसावतो व 'किस्मत्' अशी गर्जना करून शत्रूवर तुटून पडतो आणि क्षणभर तो अजिंक्य भासतो. परतु शत्रूचा जोराचा हल्ला येऊन त्याला माघार घ्यावी लागतांच तो कपाळाला हात लावून बसतो व 'किस्मत्' दुसरे काय असें म्हणतो. तो अरब शिपाई लढाईस तेथे पुन्हा उभा राहूं शकत नाही.

या दोन प्रकारांपेक्षां तिसराहि एक प्रकार आहे. तो म्हणजे ईश्वराला आई म्हणून पूजून त्यापासून मिळणाऱ्या धैर्याचा. ही जी दिव्य मातृपूजा आहे, येथे मरणाला मिठी मारावयाची आहे. येथें दुःखाचा खाऊ आहे. अलोट धैर्य हाच आनंद आहे. आईचा हात मृदुच असेल असें नाही, तर तो कठोरहि असेल. तो अमृताप्रमाणें गोडच असेल असें नाहीं, तर विषासारखा कडुहि असेल. आई तारीलहि किंवा मारीलहि. परंतु आईनें मुलाला कितीहि झोडपलें, मारलें, पिटलें, तरी मूल तिच्याच पदराला धरणार, तिच्याच ओंच्यांत डोकें खुपसणार. आई जें जें देईल तें तें सारें गोडच आहे, चांगलें आहे, पूज्य आहे. दुःखांतहि आईची करुणाच आहे. आपत्ति हा तिनेच

पाठविलेला आशीर्वाद, तिचाच तो पवित्र दूत. त्याचें स्वागत केलें पाहिजे. आई मुलाचें वाटेल तें करील. त्याला रडवील किंवा हंसवील; चढवील किंवा पाडील. परंतु भक्त विचारतो, 'आई, तू नाहींस तरी कोठे? सर्वत्र तूंच आहेस. नाना रूपांनी तूच येतेस. मारावयास आलेली राक्षसीण तूंच, तारायास आलेली देवता तूंच. कोणत्याहि वेषांत तूं ये तुला शोधून काढण्यास ी शिकतों आहे. तुझा लपंडाव मी चालूं देणार नाहीं '

" जेथे जातो तेथें तू माझा सांगाती "

विठ्ठल सुखा। विठ्ठल दुःखा

" सर्वस्वी तुझाच स्पर्श मी अनुभवून राहिलों आहे. पंख लावून मी सातांसमुद्रापलीकडे गेलों तरी तेथेहि तूंच मला दिसतेस. मी स्वर्गांत गेलों तरी तेथे तू व नरकांत पडलो तरी तेथे तू."

ही मातृपूजा म्हणजे वीराचा निर्भय वेदान्त आहे. माता म्हणजे सर्वस्व. माता हीच आदिशक्ति, मूळ कारण. माता म्हणजेच अनत शक्ति, अनंत ज्ञान. अशा ह्या शक्तीशी एकरूप होणें म्हणजेच समाधि. स्वतःला पुसून टाकून, स्वतःचें व्यक्तित्व विसरून, केवळ निरहंकारी होऊनच त्या दिव्य दृष्टीचा, त्या महान् अनुभवाचा लाभ होणें शक्य आहे. श्रुति सांगते, " जेव्हां वासना मरते, सर्व सशय जेव्हा नष्ट होतात, सर्व वृत्ति जेव्हां विरून जातात, तेव्हांच मर्त्य अमर्त्य होतो, जीव शिव होतो "

ज्याची शक्ति आपल्या शक्तीपेक्षां फारच मोठी असते, त्याचा आपण तिरकार करतों, बहुधा आपण त्याच्यावर प्रेम करीत नाही नायगारा धबधब्याजवळील एका गुहेत एक बाई चुकून मागे राहिली. ती बाई परत आल्यावर सांगे, " त्या धबधब्याची प्रचंड गर्जना ऐकून मला त्याचा तिरस्कार वाटे, तिटकारा येई." हा तिरस्कार म्हणजे तिच्या मनांतील भीतीचेंच तें प्रत्यक्ष सक्रीय स्वरूप होय. भीतीचें तिरस्कारांत रूपांतर होतें. मोठा पुरुष जवळ असला म्हणजे आपली पूजा येथें कशी होईल अशी छोटचाला भीति वाटते. अशा भीतीतच अहंतेचा जन्म होतो. मध्यरात्रीचें आकाश आपणांस फार सुदर वाटतें. कारण लाखो लहान लहान तारका तेथे लुकलुक करीत असतात. परंतु आपणांस जर आकाशांत जातां आलें व त्या लहान तारकांऐवजी कोटचावधि प्रचड जळते गोल आपल्या सभोंवती जर दिसले, तर आपण त्यांचा मनांत तिरस्कार करूं. कारण त्या प्रचड विराट्

समूहांत आपण म्हणजे कोणीच नाहीं असें आपणांस वाटेल. आपला अहंकार दुखविला जाईल. कळत वा न कळत, आपण पावलोपावलीं सभोंवतालच्या चराचर जगाची स्वत.शी तुलना करीत असतों. त्या तुलनेंत आपण जर मोठे ठरलों तर आपणांस आनंद होतो, गुदगुदल्या होतात, तोंडावर हास्य खेळतें. परंतु त्या तुलनेत जर आपण फारच कमी पडतो, हिणकस ठरतों असें दिसले, तर आपण चिडखोर, त्रासिक, व तिरस्कार करणारे–थोडक्यांत माणुसघाणे होतों. आपल्या साऱ्या भावनांचा उगम या तुलनेपासून होत असतो. ही तुलना आपले जीवन रगवीत असते. आणि या तुलनेचा जन्म आपल्या अहंपूजेत असतो. जगांत साक्षी होऊन राहण्यांत जो दिव्य आनंद आहे, तो फारच थोड्या भाग्यवताना लाभत असतो व आईशी एकरूप होण्यांतील, आईशी चिरयुक्त होण्यांतील तो परमानंद चाखणारा तर जगात नाहीच कोणी म्हणाना.

परतु ज्यांना हा दिव्य आनद चाखावयाचा आहे, त्यांनी मरणाचे उपासक झालें पाहिजे. दु.खाचा भरलेला पेला पटकन् पिऊन रिकामा करून तो मातेपुढें करा व म्हणा "और लाव." बलवताला माघार माहीत नसते. शूराला दुःखाचों दरकार नसते 'निश्चयी व निर्मळ नरसिंहाला निराशा कधी शिवत नाहीं. पश्चात्ताप करण्याची कधी पाळी येत नाही. काव्यांतून ज्या निराशेची वर्णनें येतात, ती निराशा सामर्थ्यसंभव नसते, ती निराशा अहकारोद्भव असते आपणांला ज्या क्षणी अहकार घेरतो, ज्या क्षणी स्वतःची जाणीव होते, त्या क्षणीच आपण दुबळे आहोत असें आपणांस वाटू लागतें, आपण एकटे आहोंत असें वाटू लागतें. कारण आईपासून आपण त्या क्षणीं दूर झालेले असतों. स्वतःची स्मृति होतांच माता दुरावते व आपणांस आपला दुबळेपणा व अगतिकत्व यांची जाणीव होते. वीराला स्वत.ची जाणीवच नसते, स्वतःची शुद्धच नसते. त्याचें देहभान हरपतें. कड्यावरून बेधडक उड्या घेत सागराकडे जाणें एवढेच नदीला माहीत असतें. स्वतःच्या शरीराच्या चिंधड्या उडाल्या तरी तिला पर्वा नसते. पुढें कांटे आहेत का दरी आहे–कांहीहि ती पहात नाही. वीराचें तसेच असतें. मार्गात भेटणारें भलें की बुरें, चांगले की वाईट–हें तो पहातच नाही. कांटे असोत वा फुलें असोत, तो आपल्याच नादांत असतो. सारें तुडवीत पुढें जातो. फुलांना कवटाळण्यासाठी धावत नाही, कांटे पाहून रडत बसत

नाहीं. मार्गांमधील सर्व द्वंद्वांना काटीत छाटीत तो पुढेंच जातो. आणखी पुढें हाच त्याचा मंत्र. पायाखालच्या तलवारी वर हवेंतच आहेत असें त्याला भासतें व त्यांच्यावरून तो नाचत जातो. पायांखालचे निखारे गुलाबच फुलले आहेत असें समजून पुढें जातो. तो आजूबाजूचें सारे विसरतो. तो द्वितहोत होतो, जीवन्मुक्त होतो.

श्रीरामकृष्णांबद्दल विवेकानंद म्हणत; "त्यांना दुबळेपणा माहीत नव्हता. परंतु रामकृष्ण म्हणून कोणी व्यक्ति आहे, हेंहि ते विसरूनच गेले होते." मातृपूजा करणाराला हें असलें अलोट धैर्य, हा अतुल व अदम्य उत्साह प्राप्त होत असतो. ज्यानें अनंतांत बुडी मारिली, त्याला कोणाचें भय? त्याला जगांत सारेच सज्जन व सारेच सोयरे. त्याला जगांत सारेंच मंगल व सारेंच गोड. "मधुनक्तमुतोषसि। मधुमत्पार्थिवं रजः—" सारें त्याला गोडच गोड.

उषा मला गोड निशाहि गोड.

अंधार त्याला जितका प्रिय, तितकाच प्रकाशहि प्रिय. आकाशांतील तारे त्याला जितके सुंदर, तितकीच पृथ्वीवरील धूळहि त्याला सुंदर! अशाला कशाची भीति? त्या मृत्यूलाहि तो मारून जातो. तो मृत्यूचा घोट करतो व त्याला आपल्या पोटांत ठेवून देतो.

यस्यच्छाया अमृतं यस्य मृत्युः

अशी त्याची स्थिति होते. जीवन व मरण दोघांना व्यापून तो उरतो. त्याला सुख व दुःख विभिन्न दिसतच नाहीत. मायेचा पडदा टरकावून तो फेंकून देतो व त्या पडद्यापलीकडील अनंताचें, सच्चिदानंदाच्या मूर्तीचें दर्शन घेतो. तो कवि जॉर्ज इलियट म्हणतो,

"संत हे मग जगासाठीं जळतात व प्रकाश देतात. दुसऱ्यांच्या विकासासाठीं स्वतः जळत राहण्यांतच सूर्याप्रमाणें त्यांना धन्यता वाटते. पदार्थ जळणें व पेटणें म्हणजेच त्यांचें जीवन. विलासांत त्यांचा जीव गुदमरतो; कष्टांच्या आगडोंबांतच त्यांना शांत व शीतळ जीवन लाभतें-तेथेंच त्यांना मोकळेपणानें श्वासोच्छ्वास करतां येतो.

संतो तपसा भूमिं धारयन्ति.

आपल्या तपानें व जळण्यानें ते पृथ्वीचें धारण करितात. हे शब्द खरे आहेत. कारण खरी शक्ति अशीच असते. त्या विश्वमातेचे पुत्र असेच असतात व असावयाचे.

# भूत व भविष्य :१२:

कांहीं लोक भारताच्या भूतकाळाकडेच सदैव दृष्टि ठेवून प्रयत्न करीत असतात; तर कांहीची दृष्टि भविष्यकाळावरंच खिळलेली असते. आपणांला दोन्ही दृष्टीचीं जरुरी आहे; परंतु त्यांतल्यात्यांत डावे उजवे पहावयाचें झालें, तर दुसरी दृष्टि ही अधिक महत्त्वाची आहे. भूतकाळाची जरूर आहे. कारण भूतांतूनच भविष्य निर्माण होतो. भूतकाळ हे भविष्य-काळाचें बीज आहे. पेरलेल्या दाण्यांतूनच उद्यांचा अकुर फुटणार. परंतु बीज जरी पेरले असलें तरी त्याला पुढे कोणतें वळण द्यावे, अकुरास कोणत्या दिशेनें वाढवावे, या बीजाला कोणते खत घातले असतां अकूर तेजाचा येईल, भावी वृक्ष जोमदार होईल, हे पाहणेंही महत्त्वाचे आहे. खरे शिक्षण हें उपहासानें मिळत नसते; एकमेकाचे उणे पाहून, शिव्याशाप देऊन मिळत नसतें. ज्या गोष्टीची आपणांस तहान आहे, ज्या गोष्टीसाठीं आपली सारी धडपड आहे, त्या गोष्टी ज्याला अधिक नीट कळतात, अधिक पूर्णपणें त्या ज्याला माहीत आहेत, तोच आपला खरा शिक्षक होय व तोच आपणांस तयार करतो. आपण जो प्रयत्न करीत आहोत, तो बरोबर आहे का चुकत आहे, आणखी काय केल्याने तो प्रयत्न अधिक सुदर व यशःशील होईल, हें शिक्षक दाखवून देत असतो. आपले खरें स्वरूप काय हें जो आपणांस समजावून सांगतो, व जीवनाची दिशा आपणांस दाखवून आशा देतो, तोच खरा शिक्षक.

राष्ट्राचें व्यक्तीसारखेंच आहे. राष्ट्राची सदैव निंदा करून राष्ट्र वर चढत नसतें आपली स्वतःची उगीच निंदा करून घेणे म्हणजे ती आत्म-हत्याच आहे. निंदा म्हणजे महान् हत्या होय. आपण वाईट, आपले पूर्वज वाईट, आपला धर्म वाईट, संस्कृति वाईट असे म्हटल्यानें आपणच आपल्या पायांवर कुऱ्हाड घालून घेत असतो. पाय तुटल्यावर, पांगळे झाल्यावर प्रगति कशी करणार? ज्याचा भूतकाळ कुचकामाचा व अपेशीच ठरला, त्याला भविष्यकाळच नाही. निस्सारच जर भूतकाळ असेल व त्याच्यावरच जर आपण भविष्यकाळ उभारूं पाहूं, तर तो गडगडून खाली येईल. कच्च्या पायावरचें, बाजूवर बांधलेलें घर टिकणार कसें? शिकावयास लागण्यापूर्वी शिकणाऱ्यामधील दिव्यता आपण प्रथम पाहिली पाहिजे. सेवा म्हणजे

पूजा आहे; भूतदया म्हणजे पूजा आहे; शिक्षणहि त्याचप्रमाणें पूजा आहे. तुमच्यामध्यें स्वतंत्र, विशुद्ध, सर्वशक्तिमान् व शाश्वत-सुंदर असें आत्मतत्त्व मला दिसतें व तें प्रकट होण्याच्या बाबतींत असणारे जे अडथळे ते दूर करण्याच्या कामांत मी तुम्हांस मदत करावयास येतों-म्हणजेच शिक्षण-म्हणजेच सेवा-म्हणजेच सर्व कांहीं. जर सर्व मानवजात तुमच्यांत साठवलेली नसेल, सारें ब्रह्मांड तुमच्या पिंडीं भरलेलें नसेल, तर आमच्या प्रयत्नांनीं काय होणार आहे ? बीजामधला टपोरेपणा दिसतो व म्हणून आपण पाणी घालतों. मनुष्यांतील दिव्यता दिसते व आपण ती प्रकट व्हावयास मदत करतों. तुमच्या जीवनभूमींत कांहीच नसेल तर कितीहि खणलें तरी दगडमातीशिवाय आमच्या हातांत काय येणार ? तुमच्या जमीनीत ठेवा नसेल, जुनें ठेवणें नसेल तर तुम्ही आम्ही कितीही प्रयत्न केले तरी काय मिळणार ? ते प्रयत्न निष्फळ होतील.

व्यक्तीच्या प्रगतीप्रमाणेंच राष्ट्रांची प्रगति असते, समाजाची प्रगति असते. प्रगति व्हावयास, विकास व्हावयास ध्येय डोळ्यांसमोर स्वच्छ दिसलें पाहिजे. आज दोन पावलें या रस्त्यानें, उद्यां त्या रस्त्यानें असें धरसोडीचें वर्तन केल्यानें प्रगति तर होत नाहीच, उलट निराशा पदरी येते. कष्ट भरपूर पडूनच्या पडून, उत्साहशक्ति खर्च होऊनच्या होऊन, पदरांत फळ नसतें. पुन्हां जागच्या जागींच मनुष्य येऊन बसतो ध्येय ठरलें पाहिजे व त्या ध्येयासाठीं भूतकाळांत जे प्रयत्न झाले असतील, त्या प्रयत्नांबद्दल आपण कृतज्ञ राहिले पाहिजे. यामुळेच ज्या ज्या महान् चळवळी होतात, त्या चळवळीतून सुद्धां थोडें तरि पुराणप्रियत्व असतेंच असतें पूर्वेतिहासाबद्दल भक्ति थोडी तरि त्या चळवळींतून दिसून आल्याशिवाय राहणार नाही.

परंतु भूत व भविष्य या दोहोंतून एकालाच चिकटून बसावयाचें असेल, तर भूतकाळापेक्षां भविष्यकाळालाच धरून ठेवलेलें बरे. काही झालें तरी, आपली इच्छा नसली तरीहि, थोडें तरी परंपरेचें रक्त आपल्याबरोबर येणारच येणार. थोडा तरी तो सुगंध बरोबर आल्याशिवाय राहणार नाहीं. जुनें कांहीं तरी थोडें बरोबर येणार व आपण पुढच्यासाठीं नवीन कांहीं तरी करून ठेवणार. दुसऱ्यांना मुळींच स्वातंत्र्य न देण्याची जी पुरातन्यांची, सनातन्यांची वृत्ति, त्या वृत्तीमुळें तरुण बेताल व अधीर होतात. गुलाम करूं पाहणाऱ्या या जुन्या लोकांचीं गांठोडीं भिरकावून द्यावीं असें त्यांना वाटूं

लागतें; जुन्यांच्या या वृत्तीनेंच तरुण आंधळे होतात. कृतीला प्रतिकृति, ध्वनीचा प्रतिध्वनी तुम्ही मागेच ओढीत बसलात तर तरुण पुढेंच खेंचणार. तुम्ही बद्ध करूं पाहाल तर ते मुक्त होऊं पाहाणार. तुम्ही सारखीच जुनीं बंधनें घालू पाहाल तर ते बंधनाच्या पलीकडे जाण्यासाठी उठणार. जुन्याला चिकटून राहणें हा दोष नाहीं, परतु दुसऱ्यालाहि मोकळीक न देणें हा गुन्हा आहे ही गोष्ट तरूणहि कबूल करितील. जुन्या लोकांनीं, 'जुनें तें सारें सोनें' असें त्यांना वाटत असेल, तर त्यांनी तें उराशीं धरून बसावें. परंतु त्यांनीं तरूणाना मोकळीक द्यावी. दुसऱ्यानेंही तें सोनेंच म्हणावें असला दुराग्रह त्यांनीं धरूं नये. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत, "सर्व धर्म सत्य आहेत. त्यांच्यांतील बहुतेक सारें अनुभवांतही सत्य आहे. परतु दुसऱ्या धर्मांतील गोष्टीना, दुसऱ्या धर्मांतील तत्त्वाना एकमेक असत्य मानतात. हें एक महान् असत्य मात्र या सर्व धर्मांत आहे." त्याचप्रमाणें जुन्याला चिकटून बसणारे पुराणप्रिय लोक हेहि सत्य आहेत, खरे आहेत. फक्त "तुम्ही मूर्ख चुकतां" असें जेव्हां ते तरुणांना म्हणतात, तेव्हां मात्र ते असत्य वागतात, चूक करतात. तरुणांचेंही म्हणणें सत्य आहे; फक्त जेव्हां जुन्याला प्रेमानें कवटाळणाऱ्यांचा, जुन्याकडे भक्तिभावानें दृष्टि फेंकणाऱ्या वाडवडिलांचा ते तिरस्कार करतात, त्यांच्याविरुद्ध कोल्हेकुई करतात, तेव्हां मात्र ते चुकतात, तेव्हां ते असत्य मार्गानें जातात. मला स्वातंत्र्य पाहिजे असेल तर मी दुसऱ्यासही तें दिलें पाहिजे.

वृद्धानें तरुणाला व तरुणानें वृद्धाला प्रेम दिलें पाहिजे. परस्परांचें शुभचिंतन केले पाहिजे. "शुभास्ते पंथानः संतु"—तुमचा मार्ग मगलप्रद ठरो—असें परस्परांनी परस्परांस प्रेमानें म्हणावें व स्वतःचे प्रयोग करीत राहावें, स्वतःच्या धर्माकडे जात राहावें. कोणाचा मार्ग चांगला हें काळ ठरवील. परस्परांच्या मंगलार्थ व सिद्धीसाठी परस्परांनीं प्रार्थना करावी. आपणांला हिंदुस्थान म्हणजे युरोप-अमेरिकेची निर्जीव प्रतिकृति करावयाची आहे का? नकोरे देवा! असलें दुर्दैव या भारतवर्षाच्या माथीं नको. परंतु तरुणांचें जर असेंच ध्येय असेल, हिंदुस्थान म्हणजे युरोप अमेरिकेची नक्कल, त्यांची छाया, असें करण्याचें जर त्यांचें ध्येय असेल, तर मग या प्राचीन खजिन्यांना, जुन्या ठेवण्यांना, प्राणापेक्षांहि कांहीं जास्त जपून ठेवणारे असे जे श्रद्धावान् कडवे वडील लोक, ते या तरुणांच्या उल्लूपणाला

अडवण्यासाठीं उभारलेले भक्कम किल्लेकोटच आहेत असें म्हटले पाहिजे. तरुणांचें असलें विवेकहीन अनुकरणाचें ध्येय असेल, तर वडील लोक मोलवान् सेवा करीत आहेत असे समजले पाहिजे. राष्ट्राचा पूर्वीचा रंग, पूर्वीचा गंध राखून ठेवणारी, परपरेचा नदादीप विझूं न देणारी, नवीन निर्जीव, विवेकहीन, मोर नाचतो म्हणून लांडोर नाचते, या प्रकाराच्या गोष्टीना अडवणारी अशी वडील मंडळी फार मोठें काम बजावीत आहेत, असें म्हणावें लागेल. परतु त्याचप्रमाणें हिदुस्थानचे पख तोडून टाकावे, त्याला हिडू फिरूं देऊ नये, त्याच्या विचाराला विश्व मोकळे करूं नये, त्यानें पिजऱ्यांतच त्या ठरलेल्या दांडीवरच ‘ पढोप्रभातें श्रीभगवान् ’ करीत राहावें, हे तरी आपणांस पाहवतें का ? आमच्या वडील मंडळीना असला दुःखी कष्टी हिंदुस्थान, परकी सत्तेच्या पारतत्र्याच्या शृंखलेपेक्षाहि अर्थहीन व सारहीन अशा ज्या रूढी व जे आचार त्यांच्या जड शृंखलानी शतकानुशतके जखडलेला व म्हणून आज जगाच्या मागे पडलेला व पारतंत्र्यांत पडलेला असा हिदुस्थान पाहण्यांत आनद व कृतार्थता वाटते का ? हिदुस्थान असा स्थाणुच राहावा, हें त्यांचे ध्येय आहे का ? जर असे तुम्हां पुरातनप्रियांचें ध्येय नसेल तर तुमच्या स्वातत्र्यप्रिय व तुम्हांला स्वच्छंदी वाटणाऱ्या मुलांबरोबर तुमचे आशीर्वाद पाठवा, तुमचे प्रेम त्यांच्या पाठीशीं असूं दे. भविष्यकाळावर जोरदार हल्ले करावयास तुमची मुलें निघत आहेत. भविष्याच्या डोगरांत सुदर लेणी खोदावयास ते जात आहेत—उत्साहानें व उमेदीनें जात आहेत. म्हणा त्यांना “ शुभास्ते पंथान: सन्तु ”. म्हणा त्यांना “ तुमचें कल्याण असो, तुमचा विजय असो ”. तुम्ही त्यांना म्हणा “ जा, शूर बाळांनो जा; छातीच्या वीरांनो जा; धैर्यशील बलवान् युवकांनो जा, पुढे जा, आणखी पुढें जा. तुमचे प्रगतीचे प्रयोग करा, तुमचे नवीन बावटे फडकवा; तुमच्या अदम्य उत्साहानें, ज्वलत आशेने पुढे जा; निर्भयपणें कूच करीत पुढे जा. तुम्ही कोठेंही गेलेत तरी एक गोष्ट आम्हांला पक्की माहीत आहे की, तुम्ही कोठेही सातासमुद्रापलीकडे गेलांत वा पाताळांत गेलांत, तरीही तुमच्या खेड्यांमध्ये आंबराईंत असणारें जें तुमचें घर त्या घराबद्दल, तेथील त्या तुळशीच्या आंगणाबद्दल, तेथील तुमच्या वाडवडिलांबद्दल तुमच्या हृदयांत सदैव प्रेम जागृत राहील. जा. आमच्या जगण्यापेक्षां तुम्ही जगणेंच जास्त श्रेयस्कर आहे असें आमचें

मत आहे. आमचें काय दस गेले पांच राहिले. तुम्ही भविष्यकाळाला बनवणारे! तुम्ही नसून आम्ही असण्यापेक्षां, आम्ही नसून तुम्ही असण्यानेच देशाचें अधिक कल्याण होईल. परंतु एक दिवस येईल की, ज्या दिवशी बाहेर भटकून भटकून, प्रयोग करून करून, तुम्ही कंटाळाल; पांखरें भटकतील भटकतील व दमून परत घरटयाकडे येतील; तुमच्या लढाया लढून तुम्ही दमून जाल; तुमचें अपूर्ण राहिलेलें काम तुम्ही तुमच्या मुलांबाळांच्या हातांत सोपवून द्याल व पुन्हा एकदां तुम्ही आपलीं हृदये, तुम्ही आपले मिटू पाहणारे डोळे व उडू पाहणारे प्राण या सर्वांना घेऊन, प्राचीन ऋषिमुनींच्या ज्ञानमंदिराकडे याल; त्या शांतिप्रद थोर अध्यात्मविद्येच्या साहाय्यानेंच, तिचा हात व आधार घेऊनच शेवटी मुक्त व्हाल, शांत व्हाल; त्यावेळेस ज्या तुमच्या वृद्ध वाडवडिलांनी—तुम्ही तिरस्कृत केलेल्या वाडवडिलांनी—हा जो ज्ञाननिधि राखून ठेवला, ही जी अध्यात्मविद्या जतन करून ठेविली, ही जी अमृतवल्ली जपून ठेविली, त्या पूर्वजांचे पुण्य स्मरण होऊन तुमच्या डोळयांतून कृतज्ञतेचे अश्रू खळखळ धावून आल्याशिवाय राहणार नाहीत; शेवटल्या क्षणाला डोके ठेवावयास हें हक्काचे, स्वतःच्या मालकीचें राष्ट्रीय ध्येयरूप मंदीर, ही आपल्याच अध्यात्ममाउलीची मांडी, ज्यांनी तुमच्यासाठी राखून ठेवली, परंतु ज्यांना तुम्ही शिव्याशाप दिलेत व हिडीस फिडीस केलेत, त्याचे थोर स्मरण होऊन तुमचा कंठ भरून येईल व हृदय सद्‌गदीत होईल. या जुन्या घरात, या तुमच्या मठींत तुम्हाला जी शांति व शीतलता मिळेल तशी तुम्हाला कोठेंही मिळालेली नसेल! या नदीकांठच्या जुन्या मंदिरांतील धूपारतीच्या वेळेचा सायंकाळचा घण घण घंटा नाद, त्याच्याहून अधिक मधुर व अधिक पवित्र संगीत आपण कोठेही ऐकले नाहीं असे तुम्हांस वाटेल! जा, बाळांनो, जा. परंतु लक्षात धरा. भूतकाळ हा भविष्यकाळासाठीच तिष्ठत असतो; त्याची अवहेलना झाली तरी तो थोरपणानें ती गिळून उभा असतो; तो मरून जाऊं इच्छित नसतो; कारण आपल्या मुलांना आपली जरूरी लागेल हें आईबाप ओळखून असतात; भूतकाळ हा भविष्यकाळाचा देव आहे व भविष्यकाळासारखा दुसरा कोणीहि भक्तोत्तम त्याला नाहीं! ”

# धर्म व राष्ट्रीय अभ्युदय :१३:

धर्मामुळें राष्ट्रें दुबळीं होतात, धर्मामुळेंच हिंदुस्थानचा ऱ्हास झाला व धर्म वगैरेंचें बंड नसल्यामुळें जपानचा अभ्युदय झाला असें जे आमच्या देशांतील कांहीं अविचारी लोक भरमसाट बडबडतात, त्याचा कितीही कडक शब्दांत निषेध केला तरी तो कमीच होणार आहे.

असल्या या असत्य व भ्रामक कल्पनांचा धुव्वा उडवून देण्यासाठीं कोठून कसा आरंभ करावा हेंच समजत नाहीं. आमच्या या वरच्या मित्रांची धर्माची जी कल्पना आहे, तिच्याच प्रथम चिंधड्या उडवाव्या का? किंवा राष्ट्राचे उदयास्त म्हणजे तरी हे काय समजतात हें त्यांस विचारावें? राष्ट्राचा ऱ्हास व विकास पाहण्याची यांची दृष्टि तरी कोणती आहे? कदाचित् कांहीं दुसरे लोक या वरील मडळीस संतापानें व रागानें एकदम म्हणतील, "जपानला वैभव आज आहे असें कोण म्हणतो! जपान रानटी आहे; जपानला धर्म नाहीं असें तुम्ही म्हणत असाल तर जपान सुधारला आहे व वैभवावर आहे हे आम्ही खरेंच मानीत नाहीं. ज्याला धर्माचा आधार नाही, तें नष्टच होणार. चोरालासुद्धां आपसांत भांडण होऊ नये म्हणून नीति लागते! जपानजवळ नीति नसेल, धर्म नसेल तर तें वैभव वैभवच नव्हे; तो बुडबुडा आहे–फुगेल फुगेल व फुटेल! जपानला धर्म नसेल तर जपानचें नांव कालोदरांत लौकरच लुप्त होईल.

तसेच कांही म्हणतील कीं, हिंदुस्थानचा ऱ्हास झाला आहे ही गोष्टही खोटी आहे. हिंदुस्थान उज्ज्वल भविष्याच्या उंबरठ्यावर उभा आहे व तारुण्याचें रक्त त्याच्या रोमारोमांत आज नाचत आहे

परंतु सत्य खरें काय आहे, तें ज्यानें त्यानें आपल्या स्वभावानुसार, वृत्त्यनुसार पहावें. असल्या गोष्टींत चर्चा अगदी निरुपयोगी असते. जशी दृष्टी तशी सृष्टी. आपल्याभोंवतीं नवीन स्वर्ग निर्माण करावयाचा आहे, नवीन पृथ्वी बनवायची आहे. जो हें करून दाखवील, त्याचा मार्ग सत्याचा. नवीन सृष्टी दिसूं लागल्यावर कोणाचा पक्ष सत्य हें प्रत्येकाला लगेच कळून येईल. नवीन स्वर्ग व नवीन पृथ्वी निर्माण करण्याची ही कामगिरी निराशावादी व खडे फोडणारे अशांच्या हातून कधींही व्हावयाची नाहीं.

हिंदुस्थानांत धर्मामुळें ऱ्हास झाला व जपानचा अभ्युदय धर्माच्या

अभावामुळें झाला असे म्हणणारे जे आमचे मित्र आहेत त्यांना आमचा असा प्रश्न आहे कीं, कृपा करून तुमची धर्माची कल्पना काय ती तरी आम्हांला नीट कळूं दे. एकदां धर्म काय याची व्याख्या ठरली म्हणजे मग कदाचित् असेंच दिसून येण्याचा संभव आहे कीं, धर्मामुळेंच हिंदुस्थान जिवंत राहिला, धर्मामुळेंच तो टिकाव धरून उभा राहिला. परंतु असें जेव्हां आम्ही म्हणतों तेव्हां धर्म याचा अर्थ रूढी, दंतकथा, स्नानसंध्या, टिळेमाळा, भस्मे व जानवी, गोमुत्रें, प्रायश्चित्ते व गोप्रदानें हा नसतो. सत्यश्रद्धा व सत्यविचारांचें आचारांत प्रगटीकरण म्हणजे धर्म हा आमचा अर्थ असतो.

अशा अर्थानें हिंदुधर्माकडे पाहूं लागलों म्हणजे मग माझें संकट दूर कर, माझा रोग बरा कर, असली दुबळी नवस करणारी मूर्तिपूजा म्हणजे हिंदुधर्म नव्हे, हें दिसून येईल. राष्ट्राच्या महान् व अनंत जीवनांत पराजयाइतकाच जयहि क्षणभंगुर आहे. सदैव विजयीच व्हाल, ऐहिक भाग्यानें मिरवाल, अशी लालूच हिंदुधर्म दाखवीत नाही. जय वा अपजय ही हिंदुधर्मातील दृष्टि नाही. यश की अपयश ही हिंदुधर्माची दृष्टि नाही. कर्म—निष्काम कर्म—एवढाच हिंदुधर्माचा शब्द आहे जय येवो वा पराजय येवो तूं आपला स्वधर्म उत्कृष्टपणें आचर, तूं आपलें कर्म नीट बजाव; तूं लढत रहा, कर्म करीत रहा; " मामनुस्मर युद्धचच " ही हिंदुधर्माची शिकवण आहे " विजयाकडे जाण्याचा एखादा जवळचा रस्ता माझ्याजवळच आहे, मी दाखवितों, या. " असले ढोंग हिंदुधर्म दाखवीत नाही. स्वर्गातील अप्सरा व नंदनवनविलास किंवा नरकांतील यमयातना, नाना फळें किंवा नाना छळ—हिंदुधर्म हें कांहीं दाखवीत नाही. तीं फळें दाखविणारा तो खरा हिंदुधर्म नव्हे. हिंदुधर्म—खरा हिंदुधर्म-आमिषें दाखवीत नाहीं. तो हिंदुधर्माचा स्वभाव नाही. " या, मी पटकन् वैभवावर चढवतों, " असें तो सांगत नाहीं. हिंदुधर्म म्हणजे गारुड्याचा खेळ नाहीं, जादुगाराची जादु नाहीं. गारुडी क्षणांत कोयींतून आंब्याचा वृक्ष बनवितो व त्याला फळेंहि लटकलेलीं दाखवतो. परंतु तो वृक्षहि क्षणांत अदृश्य होतो. सदैव तशीं आम्रफळें त्या गारुड्याला खरोखर लाभतीं तर त्याला भीक मागत फिरावें लागलें नसतें व बाजारांतील आंबे विकत घ्यावे लागले नसते. असले हातचलाखीचे खेळ करून दाखविणारा हिंदुधर्म नाहीं. जादूच्या खेळांपेक्षां हिंदुधर्म

उदात्त आहे, अशी आमची खात्री आहे. हिंदुधर्म जर केवळ विजयाचेंच तत्त्वज्ञान सांगत असेल, तर तो अपूर्ण राहील; जगाच्या अर्ध्या अनुभवावरच उभारलेला ठरेल. जय वा पराजय, यांची फिकीर न करतां तूं भलेपणानें, मनांत श्रद्धा व वर परमेश्वर या भावनेनें कर्म करीत रहा, अविरत झगडत रहा, असें सांगून हिंदुधर्म जयपराजयांच्या वर गेला आहे. तो विजयाचे नगारे वाजवीत नाही व पराजयाचे गाराणेंही गात नाहीं. जयानें हुरळू नका, उन्मत्त होऊ नका; पराजयानें होरपळू नका, मुळमुळू रडू नका, असे सांगून हिदुधर्म जणु निर्द्वद्वाकडे घेऊन जात आहे, केवळ कर्तव्याकडे घेऊन जात आहे.

आपणांमध्यें खरी अचल श्रद्धा असेल, तर जय किंवा पराजयाचे आपण साक्षी बनू, जगांतील जयापजयांचे खेळ, खाली वर नाचणाऱ्या राष्ट्रांचा नाच, हें रहाटगाडगें कौतूकानें पहात राहूं. विजयाकडे जिवाची शर्थ करून सदैव जाण्याचा आम्ही प्रयत्न करू, परंतु त्या विजयाचेही आम्ही गुलाम नाही, विजयाचे मिधे नाही. पराजयाचें विजयांत परिवर्तन करण्यासाठी आम्ही झगडत राहिलों तरी त्यावरून पराजयाने आम्ही खचून गेलों होतो असेही नाही. जय वा पराजय-आम्ही धीरगंभीर राहूं. पडत्या व चढत्या-दोन्ही प्रकारच्या लाटांशी हातघाई करून ध्येयतीर गाठू. समुद्रांत पडणाऱ्याला पावलापावलाला एक लाट खाली नेते, दुसरी वर चढवते-परंतु तो पुढेच जात असतो. त्याप्रमाणें जयापजयाची पाउलें टाकीत आम्हीं ध्येयदेव गांठू. जय व पराजय ही माझी दोन पावलें आहेत. जन्ममरणाचीं पावले टाकीत मनुष्य ज्याप्रमाणें पुढे चालला आहे, त्याप्रमाणे जयापजयाचीं पावले टाकीत आपणांस पुढें जावयाचें आहे. जय वा अपजय-या दोहोंना साधन करून मला माझे परमविकासाचें-परिपूर्णतेचें ध्येय गांठावयाचें आहे. आमच्या अंतःकरणांत सार्वभौम असा, परमथोर असा, कशानेंही उल्लू न होणारा व खचून न जाणारा असा संयम आहे या महान् संयमाच्या जोरावर जगांतील बऱ्यावाईट परिस्थितीचा आम्ही आमच्या मनावर यत्किंचितही परिणाम होऊं देणार नाही. ज्यांची सारी दृष्टि या मर्त्य जगांतच मिळणाऱ्या विजयावर व वैभवावर, सुखांवर व विकासांवर खिळलेली आहे, त्यांचा आपणांस हेवा व मत्सर कशाला वाटावा ? या जगांत जयापजय, सुखदुःख जन्ममरण, पतन आरोहण, उदय व अस्त, भरती ओहटी, मान अपमान,

विकास व विनाश, हंसणें व रडणें, स्तुति व निंदा यांचा विशाल दोला सारखा पुढे मागें होत आहे. सुखापाठोपाठ छायेप्रमाणें येणारें दुःख, मोठ्या विजयाच्या पाठोपाठ उरांत धडकी भरवणारा पराजय, ट्राफल्गारच्या पाठोपाठ आस्टर्लिट्झ, असें चक्रनेमिक्रमेण हे जग सारखें झुलत आहे, हें आपणांस माहीत नाही का ? या द्वद्वांतून तर पलीकडे जावयाचें आहे. जयाला व पराजयाला दोघांसहि काटीत छाटीत आपणांस पुढे जावयाचें आहे. समोर त्या पैलतीरावर असलेल्या परमेश्वरास पहावयाचें आहे.

परिस्थितीच्या भरतीओहटीतून, या जयापजयांतून, दोहोंतूनही जो मानवी विचार, जे मानवी चारित्र्य निर्माण होत असतें, त्या सत्य व चिरंजीवी वस्तूला धर्म म्हणतात. हे जे विचारधन आपण निर्माण करीत असतो, हें जे चारित्र्य आपण जमा करीत असतों, त्याच्याशीं सहकार्य करूनच, त्याची मदत घेऊनच आपण आपलें सामाजिक जीवन किंवा राष्ट्रीय जीवन उभारीत असतों. राष्ट्रीय जीवन व धर्म यांची फारकत नसते धर्म व राष्ट्र, धर्म व समाज याच्यांत प्राण व कुडी असा संबंध असतो. हा चारित्र्यरूप व वैचारिक धर्म याची राष्ट्रीय जीवनांतून हकालपट्टी कराल तर नाश होईल. प्राचीन ईजिप्त, मेसोपेटोमिया, खाल्डिया, असीरिया—यांना काळाच्या पोटांतून पुन्हां कोण वर काढील ? कोणीही नाही. कारण ज्या गोष्टींनी त्यांना विशिष्टत्व आलें होतें, ज्या विचारांनीं, ज्या चारित्र्यानें त्यांना विशिष्टत्व मिळालें होते, त्या गोष्टी कायमच्याच नाहीशा झाल्या. भाषासुद्धां, असा काही चारित्र्य-धर्म असल्याशिवाय, मोलवान कल्पना व थोर विचार याचा सांठा असल्याशिवाय, जिवंत राहूं शकत नाही. जेथें चारित्र्याचा विकास उत्तरोत्तर होत नाही तेथील भाषाही मरत जाते. यासाठी क्षणिक लखलखाटानें आपण दिपून जाऊं नये. रोम कोठें आहे, स्पेन कोठे आहे; पोर्तुगाल कोठे आहे ? व्यक्तीच्या जीवनांत जशीं घटकापळें त्याप्रमाणें राष्ट्राच्या जीवनांत अनेक शतकें, अनेक युगें म्हणजे क्षणाप्रमाणें आहेत. काळ चाललाच आहे. काळाच्या जाण्या येण्यावर राष्ट्रांचे अस्तोदय अवलंबून असतात. परंतु जो विचार-निधि; जीं दिव्य ध्येयें राष्ट्राला, या भरती ओहटीच्या काळांत, या येणाऱ्या जाणाऱ्या कालौघांत मिळालेली असतात, ती जोंपर्यंत राष्ट्र उराशीं धरून ठेवील, तीं जोंपर्यंत निष्ठेनें, चिकाटीनें, कष्टानें, क्लेशानें, प्रसंगीं प्राणार्पण करूनही

सांभाळील, हें बीज, ही पुंजी जोपर्यंत राष्ट्र हातची जाऊं देणार नाहीं, प्राणांचें पांघरूण घालून त्याला जपेल, तोंपर्यंत राष्ट्राला मरण नाही. क्षणभर व्यापारांत एखाद्या राष्ट्राची चलती झाली म्हणून तें मोठे शतकृत्य झालें, तें इतिहासांत नमूद करून ठेवण्याच्या लायकीचें झालें असें होत नाहीं. विजय मिळविणाऱ्या पुरुषाचें चारित्र्य राष्ट्रातून कधीही मरून जाऊ नये, यासाठी खटपट होत नसेल, तें चारित्र्य सांभाळून ठेवण्यासाठी प्रयत्न होत नसतील, तें चिरजीव व्हावें म्हणून कष्ट होत नसतील, तर ते विजय विजयी पुरुषाबरोबरच विलयाला जातील. चारित्र्य व प्रामाणिकपणा जर पाठीशीं नसेल तर व्यापारी भरभराट फार दिवस टिकणार नाहीं.

आपला धर्म शिकवितो की, हे जग म्हणजे कांही अंतिम सत्य नव्हे. अनंततेच्या मानाने हे जग कांहीच नाही, मिथ्याच म्हणाना. हिंदुधर्माची ही विशाल दृष्टि ज्याच्या हृदयांत श्रद्धापूर्वक बिंबलेली असेल, तो बाह्य ख्यालीखुशालीच्या जीवनासाठीं, बाह्य सुखविलासांसाठी, भराभरा सुखोपभोग भोगावयास मिळावेत म्हणून, उच्चतम असा धार्मिक आनंद, चारित्र्याचा व सत्यानुभवाचा आनंद, तो दिव्य व अवीट असा आंतरिक आनंद गमवावयास तयार होणार नाही; मृत्कणासाठी माणिक मोती फेकून द्यावयास तयार होणार नाही. चिंतामणि फेकून गारगोटी पदरी बांधणार नाही; जिवंत झरा सोडून क्षणीक नळाच्या थेंब थेंब पाण्यावर विसंबणार नाही. आणि या पृथ्वीवरचेंच वैभव पाहिजे असलें तरीसुद्धां, क्षणिक सुखापेक्षां सदसद्विवेक बुद्धीला मान देण्याची, तिचा सूर ऐकण्याची जी अत्यंत थोर वृत्ति, तीच जवळ असली पाहिजे. ऐहिक किंवा पारमार्थिक—कोणत्याहि फळाकडे बघा, सद्गुणसाधनें तीच आहेत, तीच लागतील.

---

# प्रपंच व परमार्थ :१४:

पृथ्वीवर अनेक देश आहेत; परंतु प्रत्येक देशांत हे श्रेष्ठ व कनिष्ठ, हें उच्च व हें नीच, हें पर हे अपर, हे पवित्र हे अपवित्र, हे सांसारिक हें पारमार्थिक असे भेद दिसून येतात. या पर अपराच्या, उच्चनीचाच्या

कल्पना पार झुगारून देण्याचें धाडस जर कोणी केले असेल तर तें फक्त हिंदुस्थाननें होय. या भेदाच्या भिती उडवून टाकण्याचें काम भारताने केलें आहे. विचाराची इतकी धीरता इतरास दाखवतां आली नाही; विचाराची एवढी मोठी उडी इतर राष्ट्रांस मारतां आली नाही. अद्वैत तत्त्वज्ञानाचा तळास लावून, बुडया मारून मारून ह्या थोर तत्त्वज्ञानमौक्तिकाला वर काढून आणून, त्याच्या जोरावर सर्व जीवनाचा साक्षी होऊन राहण्याचें महाभाग्य, जीवन म्हणजे खेळ आहे, लीला आहे, असे अंतरगी समजून वागण्याचें भाग्य मानवाला हिंदुधर्माने दिले आहे. आपल्या थोर पूर्वजांची महनीय करणी व विशाल विचारसरणी, त्यांची कृत्ये व त्यांची ध्येयें यांना शोभेसें आपण वागणार नाही का? आपल्या पूर्वजांच्या मार्गावरून आपणच जर गेलों नाही, तर दुसऱ्यांना तरी तेथे बोलावण्यास आपणाला तोंड कोठून राहणार?

पकडण्याच्या आधी थोडा वेळच पुढील तेजस्वी व गभीर शब्द येशू ख्रिस्त बोलले होते. प्रभु म्हणाला, "सायमन, सायमन! सैतान तुला निवडून काढणार आहे. सैतानाची दृष्टि तुझ्याकडे वळली आहे, तुझ्या जीवनाच्या कणसांतील धान्याचा दाणा, शुद्ध तेजस्वी सत्त्वाचा दाणा दिसावा म्हणून सैतान तुला झोडपून पाहणार आहे." भावि कृत्यांच्या छाया आधीच दिसू लागतात अशी म्हण आहे. पावसाची लक्षणें आधी दिसू लागतात. भगवान् ख्रिस्त हे शब्द जणु स्वतःलाच उद्देशून बोलत होते. अवतारी पुरुषाचें सामर्थ्य अपरपार असतें. सारें जग कट करून त्याची कसोटी पहावयास येत असते; सर्व जगाची अशी इच्छा असते की त्या महापुरुषानें शरण यावें; आपल्या बाजूस कोणी नाहीं, आपण असहाय, निराधार सर्वत्यक्त आहोत, अशी स्वत.च्या दुबळेपणाची त्या महापुरुषास जाणीव व्हावी अशी जणु जगाची इच्छा असते. परंतु तो महान् शक्तीचा अवतार, ती दिव्य भव्य विभूति, तो महात्मा, तोहि जगाची परीक्षा घ्यावयास तमासगिरांची परीक्षा घ्यावयास उभा राहतो; त्याची परीक्षा घ्यावयास सारें जग उभे राहातें व तो जगाची परीक्षा घ्यावयास उभा राहतो. जगांतील सारेच लोक निःसत्त्व व पोंचट झाले आहेत की काय, त्यांच्यांत कांही तेज, काही सत्त्व, कांही राम आहे की नाही, हें तो महापुरुष जाणून घेऊ इच्छितो. जगाची नाडी पहावयास तो उभा राहतो. अखिल मानवजात विकारानीं उन्मत्त होऊन सभोवतीं

हैदोस घालीत असतां तो महात्मा ध्रुवताऱ्याप्रमाणें आपल्या ध्येयाशीं निष्ठावंत राहतो. त्याची दृष्टि स्थिर असते. त्या महापुरुषाच्या पायांजवळ लाखों लाटा, कोटयावधि जीवांच्या जीवनाच्या चंचल लाटा हेलकावत असतात; परंतु पहाडाप्रमाणें तो महापुरुष अचल राहातो. समाजांत दुर्बलता, चंचलता जितकी अधिक, तितकी महात्म्याची स्थिरता, ध्येयनि ता व शक्ति हीं अधिक दिसून येतत.

अवतारी पुरुष समाजांत जन्मास येणें हा चमत्कार नाही. ही एक अपरिहार्य गोष्ट आहे. भटकणारे लोहकण चुंबकाभोंवती जमा होतात. भटकणारे ग्रहोपग्रह सूर्याभोंवती प्रदक्षिणा घालू लागतात. मानवजातीच्या भ्रमती करणाऱ्या भावनांना, अस्थिर व चंचल विकारांना व विचारांना स्थिरता देण्यासाठीच अवतारी पुरुषाची नितान्त आवश्यकता असते. आपल्यामधील पतितांतील पतित, हीनांनील हीन, यांनाही अवताराची आवश्यकता आहे. अवतारी पुरुष निर्माण करण्यांत त्यांचाही भाग असतो; त्यांनाही त्याचें श्रेय असतें. आपले सर्वांचे प्रयत्न, आपल्या सर्वांच्या धडपडी, पतितांच्या वा पवित्रांच्या, तो अवतारी पुरुष निर्माण झाल्यानें सफळ होतात. आपल्या सर्वांच्या लहान मोठ्या चुकत माकत होणाऱ्या धडपडीची बनणारी, बनतबनत येणारी जी प्रचंड लाट, हेलकावणारी काळीसावळी अस्थिर चंचल लाट—तिच्यावरचा शुभ्र स्वच्छ फेस म्हणजे महापुरुष होय आपल्या या प्रयत्नांमुळें आपण महापुरुषाशी जोडले जातों. आपल्याच चिंतनाचें व श्रमाचें फळ म्हणून तो प्रकट झालेला असतो. आपले क्षुद्र प्रयत्नही आपणांस महापुरुषाकडे घेऊन जातात; त्याच्या कार्यांत, त्याच्या जीवनांत भागीदार करतात. सेतूबंधनांत वाळूचे अंगाला चिकटलेले कण नेऊन झाडणारी खारकुंडी हिचाही भाग आहे. रामाच्या कार्यांत तिलाही स्थान आहे रामाशी हनुमानाप्रमाणें तीहि जोडली गेली. कळत वा नकळत आपले सारे लहान मोठे प्रयत्न, आपली सर्व कर्मे व आपले सर्व विचार आपणांस अवतारी पुरुष व त्याचें महान् कार्य यांच्याशीच जोडीत असतात. लहान मोठे सारे ओहोळ, पवित्र ओहोळ किंवा गाळीचा लेंड ओहळ महान् नदीला मिळण्यासाठींच चालले आहेत; व ती महान् गंगा नदी त्यांना सागराकडे घेऊन जाणार आहे. आपणांस ही दृष्टी एकदां आली म्हणजे मग उत्तरोत्तर अधिक काम करावें

असें आपणांस वाटूं लागेल. " माझा कार्यभार कमी कर. " अशी प्रभूला प्रार्थना करीत न बसतां " काम करावयास अधिक सामर्थ्य व उत्साह दे, उदंड कामें करूं दे. " अशी प्रार्थना आपण करावयास लागूं. मग आपण म्हणूं " हे देवा, मा शांति नको, मला बळ दे. " मनाची शांति हा अभ्यासाचा व संवयीचा, संयमाचा व विवेकाचा परिणाम आहे. परंतु दुबळ्याला खरी शांति असू शकत नाहीं. अनंत सागर अनंत लाटांनीं हेलकावत असतो, परंतु अंतरीं गंभीर असतो; भगवान् विष्णु सहस्र फणांच्या शेषावर शांतपणें पडून राहतात; भीष्म शरपंजरावर शांत होते; हरिश्चंद्र आगींत घातला जात असतां शांत होता; सुधन्वा तप्त तेलांत तळला जात असतां कमळाप्रमाणें हंसत राहिला. बळाशिवाय शांति नाहीं. जर खरें बळ, खरा निश्चय, खरी श्रद्धा हीं असतील तरच खऱ्या शांतीचा आनंद उपभोगतां येतो. ज्या जीवनतरूला अलोट श्रद्धेचीं व अपार सामर्थ्याचीं बळकट मुळें आहेत, त्याच जीवनतरूला खऱ्या शांतीचीं फळें लागतात. दुर्बळाला व निराश जीवाला शांति नाहीं, समाधान नाहीं, कांहीं नाहीं.

शारीरिक अहंकार, हा देह म्हणजेच मी, या गोष्टी ज्याच्याजवळ आहेत, या कल्पना जो उराशीं धरून बसला आहे, त्याची दृष्टि स्थूल असते; बाह्य विषयांवर, बाह्य सुखदुःखांवर त्याची दृष्टि खिळलेली असते. पार्थिवाच्या पलीकडे त्याची दृष्टी भेदून जात नाहीं. " त्यांनीं मला मारलें, ते माझी निंदा करतात, त्यांनीं म्हटलें, त्यांनीं टीका केली, " असल्याच क्षुद्र अनुभवांत तो एकरूप झालेला असतो; गुरफटून गेलेला असतो. या सुखदुःखाच्या, मानापमानांच्या पंकिल पल्लवांतच तो बरबटलेला असतो, व तेथूनच बोंबलत असतो; परंतु ज्याचा अहं परब्रह्मांत मिळून गेला. ज्याचा जीव शिवांत मिसळला, ज्यानें आपला जीवनबिंदु त्या महान् जीवनसिंधूत मिसळून दिला, त्याच्या वाऱ्याला देखील असल्या क्षुद्र गोष्टी, ही चिरचीर व ही रडारड, दुसऱ्यांच्या शिव्या वा स्तुति उभ्या राहात नाहींत. फारच झालें तर या गोष्टींचा तो साक्षी बनतो. आकाशांत ढग येतात व जातात; वादळें उसळतात व शांत होतात, परंतु आकाश निळें निळें शांत अखंड वर पसरून राहिलेंच आहे. हीं वरचीं वादळें वरच विरून जातात. तीं आकाशाला भेदून आंत शिरत नाहींत. थोर महात्म्यांची वृत्ति अशीच गगनाकार असते. दुःखें, संकटें यांची त्यांना भीति वाटत नाहीं. आपल्या

हृदयाकाशाची परीक्षा पहावयास आलेले हे ईश्वरी दूतच आहेत या भावनेनें तो कष्टक्लेशांकडे पाहतो. दुःखाची काळी घोंगडी वरून पांघरून आलेला हा आंत मुरलीधर सांवळा श्रीकृष्णच आहे हे तो जाणतो व बाहू उभारून या दुःखाचें स्वागत करावयास पुढें येतो. दुःखांना, विपत्तीना तो हृदयाशी धरतो. या आपत्तीचें स्वागत करावयास उभे रहा, घाबरूं नका असें भीतिग्रस्तांस तो धीर देत सांगतो व आपण स्वतः पुढें होतो. परमेश्वर नाना रूपांनी नटून येईल. तो कधीं प्रियकर म्हणून येईल, कधीं छळकर म्हणून येईल; तो कधी भिकारी म्हणून येईल, कधी राजाराजेश्वर म्हणून येईल; कधी रुद्र म्हणून येईल, कधी शिव म्हणून येईल. या सर्व रूपांत तोच आहे, जीवनाचा पेला देणारा व मरणाचा पेला देणारा एकच आहेत, हें ओळखणें हें आपले काम आहे. ही एकदां दृष्टि आली, हा लपडावाचा खेळ खेळावयाला जो शिकला, सर्व गोष्टीत लपलेल्या त्या नटमूर्तीला ओळखावयास जो शिकला, या सर्व विश्वाशी एकरूपता पहावयास जो शिकला, त्याला जीवनांत असहाय असे कधीच वाटत नाही. अनत परमात्मा अनंत हातांनी मला कवटाळीत आहे असे त्याला दिसतें. चावणारा सर्प चुंबन देऊनच गेला असें त्याला वाटतें. त्याला भय ना भीति. तो कोणाला भिणार ? छळणारा मीच व छळला जाणारा मीच. मीच मला तारीत आहे. मीच मला मारीत आहे. रडणारा व रडवणारा, छळणारा व छळला जाणारा—दोघां मिळून आईचा खेळ चालला आहे, त्या विश्वमातेची लीला चालली आहे. आईच्या नाटकांतील आम्ही दोन पात्रें—एवढेंच तो जाणतो व खेळत राहतो. अखंड सच्चिदानंदाचा अनुभव तो अंतरी घेत राहतो. अव्यग व अलोट सुख त्याच्या वर्तनात दिसून येतें. सूर्याची प्रसन्नता त्याच्या मुखावर असते; ताऱ्यांची शांति डोळयांत असते; अर्भकाचें हास्य ओठावर असतें. झऱ्यासारखा बुडबुड जणुं तो आनंदानें उसळत असतो. "आनंदसागरीचे कुंभ, चुबकळोन भरले"—असे ते महात्मे असतात. हात, पाय, नाक, डोळे फुटलेल्या अशा या आनंदाच्या चल मूर्तिच जणु आहेत असें दिसून येतें. त्यांच्या अंतःकरणांत तंबोरा लागलेला असतो, सिंहासनावर सच्चिदानंद विराजमान असतो, संगीत सुरू असतें—अखंड सुरू असतें. असा जो अवतारी पुरुष-जगाला आनंदानें आवारूं घालूं पाहणारा पुरुष, दुःखालाही सुखमय करणारा, आपत्तीच्या काळयाकुट्ट ढगांना हृदयांतील सूर्यकिरणांचा स्पर्श करून सुवर्णमय

करणारा असा जो हा महात्मा तोच आपली आशा, तोच आपली विश्रांति, तोच सखा; तोच जीवविता, तो उठविता; तोच सुखकर्ता, दुःखहर्ता, उद्धर्ता; अशा विभूतीचीच, अशा अवतारी पुरुषाचीच आपणांस तहान असते, तळमळ असते. आपले सारे लहानमोठे प्रयत्न त्यालाच निर्माण करण्यासाठी असतात. लहानमोठी हिरवी झाडे जीवन देणाऱ्या मेघाला ओढून आणतात. त्याचप्रमाणें आपली लहानमोठी जीवनें, कोणाचीं उंच, कोणाचीं ठेंगणी, कोणाचीं सरळ, कोणाची वेडीवांकडीं, कोणाचीं पवित्र, कोणाची अपवित्र, —परंतु हीं जीवनें त्या कारुण्यामृताने भरलेल्या महामेघाला, महापुरुषाला खेंचून आणण्याचा कळत वा न नकळत सारीं प्रयत्न करीत असतात; आणि तो आला म्हणजे आपण तृप्त होतो, कृतार्थ होतो.

देवघरांतील साक्षात्कार निराळा व जगाच्या धांगडधिंग्यांत येणारा साक्षात्कार निराळा. देवघरांतील देव मंजुळ मुरली वाजवणारा मुरलीधर आहे; परंतु बाहेरच्या विशाल जीवनांतील देव तो जनार्दन मुरहर आहे. घरांतील देव शिवशंकर आहे; बाहेरचा देव भीषण रुद्र आहे. दोन्ही अनुभवच. कारुण्यमय व कोपमय—दोन्ही रूपांतील साक्षात्कार हवा. हातांत प्रेमानें वडी देणारी आई व रागानें थोबाडीत देणारी आई—आई एकच व ती मला प्रिय आहे—हजारो हात, हजारो डोळे, लसलसणाऱ्या हजारों जिभा असा हा बाहेरचा नानारूपधारी विराट परमेश्वर, त्याला ओळखलें पाहिजे व गोडस गोजिरा शामल कृष्ण तोहि पाहिला पाहिजे. दोन्ही ओळखी हव्यात. दोन्ही मार्ग परब्रह्माकडे जाण्यासाठींच तयार केलेले आहेत. रस्त्यांतील, बाजारांतील विविध जीवनांत कसें वागावें, तेथेंहि त्या परमात्म्याचा साक्षात्कार कसा करून घ्यावा हें अवतारी पुरुष दाखवीत असतो. सारे आनंद व ज्ञान यांची परिसीमा म्हणजे सच्चिदानंद होय. जगाचें ज्ञान व जगांतील आनंद यानांहि शेवटीं त्यांत विलीन व्हावें लागतें—विलीन होतातच. आपले सर्वांचे बरे वाईट प्रयत्न व् अनुभव महापुरुषाच्या प्रयत्नांत परिणत होतात व महापुरुषाची इतरांना जवळ घेऊन वाढलेली जीवनगंगा शेवटीं अनंत सागरास जाऊन मिळते.

---

# आमचें प्रकाशन

| | | | रुपये |
|---|---|---|---|
| १ | तीन मुलें | साने गुरुजी | २॥ |
| २ | क्रांति | " | ३ |
| ३ | स्त्रीजीवन १ व २ | " | ३ |
| ४ | मुलांसाठीं फुलें | " | -।- |
| ५ | राष्ट्रधर्म | " | २ |
| ६ | समाजधर्म | " | ·॥· |
| ७ | समाधीवरलीं फुलें | वि. स. खांडेकर | २ |
| ८ | अत्तराचे दिवे | वि. वि. बोकील | १॥ |
| ९ | मंगळागौरीच्या रात्रीं | " | ३ |
| १० | मीना-नीना | " | १ |
| ११ | आबा | " | ३ |
| १२ | कडू साखर | ग. ल. ठोकळ | १॥ |
| १३ | काव्यकलेचें अंतरंग | के. नारखेडे | २ |
| १४ | आगरकर | पु. पां. गोखले | -॥- |
| १५ | माईची माया | ना. धों. ताम्हनकर | १ |
| १६ | जागत्या छाया | अनंत काणेकर | २ |
| १७ | पांढरपेशांचें जग | श्री. ज. जोशी | १॥ |
| १८ | समाज आणि समाजसेवा | काका कालेलकर | १ |
| १९ | सुगंध | ग. ल. ठोकळ | २ |
| २० | चौफुला | आचार्य भागवत | १ |
| २१ | बोलघेवड्या | ना. धों. ताम्हनकर | ·॥· |

प्रकाशकः— दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २.